कृषि सह संचालक संवर्गातील अधिकाऱ्यांची
कृषि संचालक पदावर तद्‌र्थ पदोन्नतीने
पदस्थापना करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आकृवि १११६/प्र.क्र.३३५ /१५अे**
मंत्रालय विस्तार इमारत,
मंत्रालय, मुंबई -३२.
तारीख: ०५ जून, २०१७.

**संदर्भ :- सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र. ईएसबी-१११६/प्र.क्र.२००/१३, दि. ०४.०२.२०१७**

**शासन निर्णय :-**

सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन पत्रान्वये केलेल्या शिफारशीनुसार कृषि सह संचालक (वेतनश्रेणी रू. १५६००-३९१०० ग्रेड पे ७६००) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना कृषि संचालक (वेतनश्रेणी रू. ३७४००-६७००० ग्रेड पे ८७००) या संवर्गात सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने पुढील अटींच्या अधीन राहुन तद्‌र्थ पदोन्नती (Ad-hoc) देऊन त्यांची पदोन्नतीने पदस्थापना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-याचे नांव व पदनाम | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|
| १ | श्री. पोकळे प्रल्हाद नानासाहेब, कृषि सह संचालक (निविष्ठा व अंदाजपत्रक) कृषि आयुक्तालय, पुणे | संचालक, (फलोत्पादन) कृषि आयुक्तालय, पुणे (रिक्त पदी) तसेच संचालक, (कृषि प्रक्रिया व नियोजन) कृषि आयुक्तालय, पुणे (अतिरिक्त कार्यभार) |
| २ | श्री. लोखंडे अशोक लक्ष्मण, विभागीय कृषि सह संचालक, ठाणे | संचालक, (निविष्ठा व गुणनियंत्रण) कृषि आयुक्तालय, पुणे (रिक्त पदी) |
| ३ | श्री. सरदार शुध्दोधन रामभाऊ, विभागीय कृषि सह संचालक, अमरावती | संचालक, महाराष्ट्र बिज प्रमाणिकरण यंत्रणा, अकोला (रिक्त पदी) |
| ४ | डॉ. कैलास परशुराम मोते, विभागीय कृषि सह संचालक, नाशिक | संचालक (मृद संधारण), कृषि आयुक्तालय, पुणे (रिक्त पदी) तसेच संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, पुणे (अतिरिक्त कार्यभार) |

२. सदर पदोन्नती तदर्थ व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्र. २७९७/२०१५ (स्टॅम्प क्र. ७२५६/२०१५) (महाराष्ट्र राज्य विरूध्द श्री. विजय घोगरे व इतर) तसेच संलग्न इतर न्यायालयीन प्रकरणामध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

३. सदर पदोन्नती ही तात्पुरत्या स्वरूपाची असल्यामुळे पदोन्नतीच्या दिनांकापासून सेवाज्येष्ठतेचा हक्क सांगता येणार नाही.

४. सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची राहील व वरीष्ठ संवर्गात ज्येष्ठतेकरिता ती ग्राहय धरता येणार नाही. त्या संवर्गात वेतनाव्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ त्यांना मिळणार नाही.

५. सदर पदोन्नती ११ महिन्यांसाठी किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तिथपर्यंत अंमलात राहील.

६. उपरोक्त अधिकाऱ्यांनी त्यांचा सध्याच्या पदाचा पदभार विभागातील निकटतम ज्येष्ठ अधिकाऱ्यांकडे सोपवून तात्काळ पदोन्नतीच्या पदावर रूजू व्हावे.

७. आयुक्त (कृषि ), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०५१६२२०००८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Maroti K. Kendre

Digitally signed by Maroti K. Kendre
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=36815ee92192ae70f1ee64ed a190b19ea66bc6407d206ab5824cb17 8beb840e4, cn=Maroti K. Kendre
Date: 2017.06.05 16:23:34 +05'30'

**( मा. के. केन्द्रे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
४. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) ½, महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
९. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
१०. संचालक, वसंतराव नाईक कृषि व्यवस्थापन व प्रशिक्षण संस्था, (वनामती) नागपूर.
११. संचालक, महाराष्ट्र बिज प्रमाणिकरण यंत्रणा, अकोला.
१२. सर्व सह सचिव/उप सचिव ( कृषि ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. उप सचिव (का.१३/ का.१६-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. सर्व विभागीय कृषि सह संचालक/अधिक्षक कृषि अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )
१५. कृषि सह संचालक, (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे
१६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )

१७. सर्व संबंधित अधिकारी ( व्दारा आयुक्त (कृषि) पुणे )

१८. निवड नस्ती /१५अे

**प्रतिलिपी,**

१) मा.मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

२) मा.राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा. प्रधान सचिव ( कृषि ) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.